**राज्यात सामाजिक व शैक्षणिकदृष्ट्या मागास प्रवर्गास विहित केलेल्या आरक्षणासहित अनुसूचित जमातीची लोकसंख्या प्रामुख्याने जास्त असलेल्या ८ आदिवासी बहुल जिल्ह्यांमध्ये जिल्हास्तरीय गट-क व गट-ड संवर्गातील पदांसाठी आरक्षण निश्चित करण्यासंदर्भात शासनास उपाययोजना सुचविण्यासाठी मा.मंत्री, महसूल यांच्या अध्यक्षतेखाली मंत्रिमंडळ उपसमिती गठीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- बीसीसी-२०२४/प्र.क्र.२४६/आरक्षण-५**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक- २३ मे, २०२५

**संदर्भ -**

महाराष्ट्र राज्यातील सामाजिक व शैक्षणिकदृष्ट्या मागासवर्गांकरिता आरक्षण अधिनियम, २०२४

**प्रस्तावना -**

संदर्भीय महाराष्ट्र राज्यातील सामाजिक व शैक्षणिकदृष्ट्या मागासवर्गांकरिता आरक्षण अधिनियम, २०२४ अन्वये सामाजिक व शैक्षणिकदृष्ट्या मागास वर्ग (एसईबीसी) प्रवर्गास शासकीय सेवेतील सरळसेवा पदभरतीस तसेच शैक्षणिक संस्थांतील प्रवेशास १० टक्के आरक्षण विहीत करण्यात आलेले आहे. त्या अनुषंगाने सामाजिक व शैक्षणिकदृष्ट्या मागास वर्गाच्या आरक्षणासह आठ आदिवासी बहुल जिल्ह्यांसाठी सुधारीत आरक्षण व बिंदूनामावली विहित करण्याच्या अनुषंगाने उपाययोजना सुचविण्यासाठी मंत्रिमंडळास अहवाल सादर करण्याकरीता मा.मंत्री, महसूल यांच्या अध्यक्षतेखाली मंत्रिमंडळ उपसिमिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

सामाजिक व शैक्षणिकदृष्ट्या मागास (एसईबीसी) वर्गाच्या १० टक्के आरक्षणासह आदिवासी बहुल जिल्ह्यांकरीता सुधारीत आरक्षण व बिंदूनामावली विहित करण्याच्या अनुषंगाने जिल्हास्तरीय गट-क व गट-ड संवर्गातील सरळसेवेची पदे भरण्यासाठी आरक्षण निश्चिती व बिंदुनामावली विहित करण्यासंदर्भात शासनास उपाययोजना सुचविणे व त्यानुसार मंत्रिमंडळास अहवाल सादर करण्याकरीता खालीलप्रमाणे मंत्रिमंडळ उपसमिती गठीत करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १ | मा.मंत्री, महसूल | अध्यक्ष |
| २ | मा.मंत्री, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य | सदस्य |
| ३ | मा.मंत्री, आदिवासी विकास | सदस्य |
| ४ | मा.मंत्री, इतर मागास बहुजन कल्याण | सदस्य |
| ५ | मा.मंत्री, कृषि | सदस्य |
| ६ | मा.मंत्री, शालेय शिक्षण | सदस्य |
| ७ | मा.मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण | सदस्य |
| ८ | सचिव (साविस), सामान्य प्रशासन विभाग | सदस्य सचिव |

२. सदर उप समितीमध्ये सचिव, विधि व न्याय विभाग हे विशेष आमंत्रित असतील.

३. सदर उप समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे असेल-

राज्यातील पालघर, धुळे, नंदुरबार, नाशिक, यवतमाळ, गडचिरोली, रायगड व चंद्रपूर या आठ आदिवासी बहुल जिल्हयातील अनुसूचित जाती/अनुसूचित जमाती/ इतर मागासवर्ग/ विमुक्त जाती /भटक्या जमाती/विशेष मागास प्रवर्ग व आर्थिकदृष्टया दुर्बल घटक या प्रवर्गांच्या आरक्षणाची सध्याची असलेली टक्केवारी विचारात घेऊन सामाजिक व शैक्षणिकदृष्ट्या मागास (एसईबीसी) वर्गाच्या १०% आरक्षणासह या आठ जिल्ह्यांसाठी जिल्हास्तरीय गट-क व गट-ड संवर्गातील सरळसेवेची पदे भरण्यासाठी आरक्षणाची टक्केवारी व बिंदुनामावली विहित करण्यासंदर्भात शासनास उपाययोजना सुचविणे.

४. समितीने आपला अहवाल एक महिन्यात शासनास सादर करावा.

५. हा शासन निर्णय शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२५०५२३११४५५०११०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RASIK AMBADAS KHADSE

Digitally signed by RASIK AMBADAS KHADSE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=41d02a5c663d2c05d362d4847bea4a1874fda4e9cb60284fb102fd7b9b3891b3, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A47200A14B42F151489F73F3E47C9E87339916 29B2302A3831B945146BE88A80, cn=RASIK AMBADAS KHADSE
Date: 2025.05.23 11:46:46 +05'30'

**( र. अं. खडसे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई-३५.
२. मा.सभापती, विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
३. मा.अध्यक्ष, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४. मा.मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२

५. मा.उप मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव/सचिव
६. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई-३२.
७. मा विरोधी पक्षनेता, विधानसभा, विधानभवन, मुंबई-३२.
८. सर्व मा. विधानसभा सदस्य/मा.विधानपरिषद सदस्य/मा.संसद सदस्य, महाराष्ट्र राज्य.
९. सर्व मा.मंत्री/मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
१०. मा.मुख्य सचिव,महाराष्ट्र राज्य.
११. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग.
१२. प्रधान सचिव,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय(विधानसभा), मुंबई.
१३. सचिव,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय(विधानपरिषद), मुंबई.
१४. सर्व विभागीय आयुक्त, महाराष्ट्र राज्य.
१५. सर्व जिल्हाधिकारी, महाराष्ट्र राज्य.
१६. सर्व सहायक आयुक्त (मागासवर्ग कक्ष), महाराष्ट्र राज्य.
१७. प्रबंधक, उच्च न्यायालय, मुळ शाखा, मुंबई.
१८. प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई.
१९. प्रबंधक, लोकायुक्त आणि उपलोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई.
२०. प्रबंधक,महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण,मुंबई,नागपूर,औरंगाबाद.
२१. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
२२. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
२३. सचिव,राज्य निवडणूक आयोग,मंत्रालय, मुंबई-३२.
२४. सचिव,राज्य माहिती आयोग, मंत्रालय, मुंबई-३२
२५. सर्व महानगरपालिकांचे आयुक्त
२६. राज्यातील सर्व महामंडळे आणि उपक्रम यांचे व्यवस्थापकीय संचालक.
२७. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
२८. सर्व मुख्याधिकारी, नगरपरिषदा/नगरपालिका.
२९. संचालक, समाजकल्याण, पुणे.
३०. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
३१. संचालक, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
३२. संचालक, सेवायोजन, मुंबई.
३३. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
३४. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर.
३५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
३६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
३७. सर्व मंत्रालयीन विभाग, त्यांना विनंती करण्यात येते की, त्यांच्या अधिपत्त्याखालील सर्व विभाग प्रमुख/ कार्यालय प्रमुख यांना सदर शासन निर्णयाची प्रत, त्यांच्या स्तरावरुन स्वतंत्रपणे पाठवून कार्यवाही करण्याच्या सूचना देण्यात याव्यात.
३८. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन मुंबई.
३९. सर्व मान्यता प्राप्त राजकीय पक्षांची मध्यवर्ती कार्यालये,महाराष्ट्र राज्य.
४०. निवड नस्ती, कार्यासन आरक्षण-५